**मौ. वर्ये, ता. जि. सातारा येथील गायरान गट क्र.४८६/२, क्षेत्र ६ हेक्टर ५३ आर पैकी क्षेत्र २ हेक्टर एवढी जमिन एवढे क्षेत्र उप प्रादेशिक परिवहन अधिकारी , सातारा कार्यालयासाठी वाहनांच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी मोटार वाहन परिवहन विभागास देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.जमिन.३५१८/प्र. क्र.२९४/ज-५ अ**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ०३२.
दि.२३/१०/२०१८.

**वाचा :-** १) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. मह/२/जमीन/सा/सीआर/१५/२०१८, दि.२०/०८/२०१८.
२) जिल्हाधिकारी, सातारा यांचे पत्र क्र.मह/३ना/कावि-२०९७, दि.०३/०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठाने जनहित याचिका क्र.२८/२०१३ प्रकरणी दिलेल्या आदेशांस अनुसरून उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा यांच्या मागणीनुसार, मौ. वर्ये, ता. जि. सातारा येथील गायरान गट क्र.४८६/२, क्षेत्र ६ हेक्टर ५३ आर पैकी क्षेत्र २ हेक्टर एवढे क्षेत्र उप प्रादेशिक परिवहन, सातारा कार्यालयासाठी वाहनांच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी परिवहन विभागास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा यांच्या मागणीनुसार, त्यांच्या कार्यालयासाठी ब्रेक टेस्ट ट्रॅक व तपासणीकरिता आलेल्या वाहनांच्या पार्किंगसाठी, कर न भरल्यामुळे अटकावून ठेवण्याची वाहनांसाठी जागा, संगणकीय ड्रायव्हिंग टेस्ट ट्रॅक तसेच स्वयंचलित अद्ययावत वाहन तपासणी केंद्र तयार करण्याकरिता उक्त जागेचा वापर प्रस्तावित आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई पीठाने जनहित याचिका क्र.२८/२०१३ प्रकरणी वाहनांच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी प्रत्येक परिवहन कार्यालयाकडे स्वत:ची किमान २५० x ६ मीटर लांबी- रूंदीची जागा असली पाहिजे, असे आदेश जारी केले आहेत. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशास अनुसरून परिवहन विभागाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ च्या कलम २२ अ च्या पोटकलम (२) खाली राज्य शासनास प्राप्त अधिकारानुसार राज्याच्या परिवहन विभागाच्या उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा यांच्या कार्यालयाच्या ब्रेक टेस्ट ट्रॅक व वाहनांच्या पार्किंगसाठी, कर न भरल्यामुळे अटकावून ठेवलेली वाहने ठेवण्यासाठी, संगणकीय ड्रायव्हिंग टेस्ट ट्रॅक तसेच स्वयंचलित अद्ययावत वाहन तपासणी केंद्र तयार करण्याकरिता मौ. वर्ये, ता. जि. सातारा येथील गायरान गट क्र.४८६/२, क्षेत्र ६ हेक्टर ५३ आर पैकी क्षेत्र २ हेक्टर एवढी जमिन भोगवटामूल्यरहित व महसूलमुक्त रीतीने पुढील अटींच्या अधीन राहून उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा यांना प्रदान करण्यास शासन स्तरावरून मान्यता देण्यात येत आहे.

**अटी :-**

१) मौ. वर्ये, ता. जि. सातारा येथील गायरान गट क्र.४८६/२, क्षेत्र ६ हेक्टर ५३ आर पैकी क्षेत्र २ हेक्टर एवढी जमिन एवढे क्षेत्र महाराष्ट्र जमिन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम १९७९, नियम ५ मधील तरतूदींनुसार भोगवटामूल्यरहित व महसूलमुक्त मंजूर करण्यात येत आहे. या तरतूदींच्या अनुषंगाने सदरचे क्षेत्र उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा यांचेकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी, सातारा यांनी करावी आणि त्यानुषंगाने आदेश निर्गमित करावेत.

२) या शासन निर्णयानुसार ," परिवहन कार्यालयाच्या वाहनांसाठीचा ब्रेक टेस्ट ट्रॅक तयार करणे " ही बाब "सार्वजनिक सुविधा/प्रयोजनार्थ " याअंतर्गत येत असल्याने सदरहू जमिनीचा वापर ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे; त्याच प्रयोजनासाठी तीचा वापर करावा.

३) मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार वाहनांच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी प्रत्येक परिवहन कार्यालयाकडे स्वत:ची किमान २५० x ६ मीटर लांबी- रूंदीची (१५ आर) एवढी जागा आवश्यक आहे. गृह (परिवहन) विभागाने वाहनांच्या ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी निर्गत करण्यात आलेल्या जमिनीच्या मर्यादेमध्ये किमान २५० x ६ मीटर लांबी- रूंदीचा ब्रेक टेस्ट ट्रॅक राहील, अशी जागा उपलब्ध होईल याबाबतची खातरजमा करावी.

३) जिल्हाधिकारी, सातारा यांना योग्य वाटतील अशा स्थिती - कालानुरूप अटी व शर्ती त्यांचेकडील आदेशामध्ये समाविष्ट करण्यात याव्यात.

४) या आदेशातील अटी व जिल्हाधिकारी, सातारा यांचे आदेशातील अन्य विहीत अटी- शर्तींपैकी कोणत्याही शर्तींचे उल्लंघन झाल्यास सदर जमिन प्रदान रद्द करण्यात येऊन कोणतीही भरपाई न देता शासन ती जमीन परत घेईल.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५६/व्यय-९/२०१८,दिनांक.२८/०९/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्यांचा संकेतांक क्र.२०१८१०२३१२४२२७२४१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

K. P. Wadte

Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2018.11.01 15:32:44 +05'30'

**( कि. पां. वडते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे स्वीय सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री (महसूल) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) विभागीय आयुक्त, पुणे.
७) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) जिल्हाधिकारी, सातारा.
९) उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सातारा.
१०) अवर सचिव (कार्यासन परि-४), गृह विभाग (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, कार्यासन ज-५ अ, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

***